**पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी पुनर्प्रत्ययी आदेश देण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-मपुवि-२०२२/प्र.क्र.१५२/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. ०२ जानेवारी, २०२४

**वाचा -** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
२) उद्योग, उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्रमांक: भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक मपुवि-२०२१/ प्र.क्र.११४/ सां.का.२, दि.०९.०८.२०२३.
४) पुराभिलेख संचालनालयाचे पत्र क्र.जा.क्र.डीओए/मायक्रोफिल्मींग/वर्क ऑर्डर/बी-२२३२,दि.०९.०८.२०२३.
५) मे. के.जी.एस. मायक्रोसिस्टीम्स या संस्थेसोबत केलेला करारनामा दि.१४.०८.२०२३
६) संचालक, पुराभिलेख संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्र.पुरा.संचा/ प्रतिचित्रण/ बासंका/२०२३/B-३९८३ दि.३१.१०.२०२३.
७) शासन पत्र,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक संकीर्ण- ८२२३ / प्र.क्र. ४१३/सां.का.४, दि.२६.१२.२०२३.

**प्रस्तावना :-**

पुराभिलेख संचालनालय, मुंबई कार्यालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत निश्चित केलेला निधी रु.१०.०० कोटी व नियमित कार्यक्रमांतर्गत लेखाशिर्ष (२२०५ १८०१) १३, कार्यालयीन खर्च अंतर्गत अर्थसंकल्पिय तरतूद रु.१०.०० कोटी अशा एकूण रु.२०.०० कोटी इतक्या रकमेच्या मर्यादेत संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण बाहेरील संस्थांकडून करुन घेण्याच्या अनुषंगाने ई-निविदा प्रक्रिया राबविली होती. सदर जाहीर ई-निविदा प्रक्रियेअंती मे. के.जी.एस. मायक्रोसिस्टीम्स या संस्थेने सादर केलेली प्रती चौकट रु.१८.२० (सर्व करासहीत) इतकी न्यूनतम (एल-१) दराची निविदा प्राप्त झाली होती. सबब, सदर निविदा प्रकियेस व रू. १८.२० प्रति चौकट दर (सर्व करासहित) या दरास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

०२. पुराभिलेख संचालनालयाने प्रसिध्द केलेल्या ई-निविदा व वर्तमानपत्रातील जाहिरातीत निविदा रक्कमेत कमी व वाढ करण्याचे होवू शकते, असे नमूद करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ मधील मुद्दा क्र.३.३.२ (अ) नुसार **"पूर्वी दिलेल्या आदेशाच्या संदर्भात पुनर्प्रत्ययी आदेश,सुरुवातीचा आदेश दिल्यानंतर सहा महिन्यांच्या कालावधीच्या पूर्वी देता येईल. पुनर्प्रत्ययी आदेश फक्त एकदाच देता येईल आणि**

**त्याचे मुल्य आणि संख्या सुरुवातीच्या आदेशाच्या ५० टक्के किंवा रु.१० कोटी यापैंकी जे कमी असेल, त्यापर्यंतची खरेदी करता येईल."** अशी तरतूद आहे. निविदेतील अटी/शर्तीनुसार तसेच उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार पुराभिलेख संचालनालयाने अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी पूर्वीच्या संस्थेस पूर्वीच्या दराने म्हणजेच रू. १८.२० प्रति चौकट दर (सर्व करासहित) या दराने रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतक्या रक्कमेचे पुनर्प्रत्ययी कार्यादेश स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव या कार्यक्रमातंर्गत निधीमधून देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. ६ नुसार शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे.

०३. स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव कार्यक्रमांर्गत मा. मंत्री (सां.का.) यांच्या अध्यक्षतेखाली कोअर समितीने पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सूक्ष्मचित्रीकरण करण्यासाठी रु.१०.०० कोटी इतका अतिरिक्त निधी संदर्भ क्र. ७ येथील इतिवृत्तानुसार मंजूर केला आहे. त्यानुसार वरील प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

पुराभिलेख संचालनालयाच्या निविदेतील अटी/शर्तीनुसार तसेच उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार पुराभिलेख संचालनालयास अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी पूर्वीच्या संस्थेस (मे. के.जी.एस. मायक्रोसिस्टीम्स) पूर्वीच्या दराने म्हणजेच रू. १८.२० प्रति चौकट दर (सर्व करासहित) या दराने रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतक्या रक्कमेचे पुनर्प्रत्ययी कार्यादेश देण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यावरील रु.१०,००,००,०००/- (रु.दहा कोटी फक्त) इतका खर्च " मागणी क्र. झेडडी-०२, २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३) ५०, इतर खर्च" या लेखाशिर्षांतर्गत मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर निविदेतील अटी व शर्तीनुसार पुराभिलेख संचालनालय संस्थेसोबत आवश्यक तो करारनामा करावा.

०५. संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी सदर संस्थेस धावत्या देयकाची (Running Bill) अदायगी करतांना काम निकषानुसार व समाधानकारकरित्या पूर्ण झाले आहे, तसेच करारनाम्यातील अटी व शर्तीची पूर्तता होत आहे, याची खातरजमा करुन संस्थेस देयक अदा करावे.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.०४.२०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला

उपविभाग-चार अ.क्र.११ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसा तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ११८/ १४४३ , दि. २० मार्च, २०२३ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २७४/ व्यय-१५ , दि. २४ मे, २०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४०२१५१९२६९२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.01.03 13:58:28 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक,पुराभिलेख संचालनालय,मुंबई.
२. महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा),मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
५. कार्यासन अधिकारी (अर्थसं./सां.का.४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. संचालक, मे. के.जी.एस. मायक्रोसिस्टीम्स यांना पुराभिलेख संचालनालयामार्फत.
७. निवड नस्ती, सां.का.२